केंद्र शासन पुरस्कृत योजनांसाठी जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समितीची स्थापना.

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः जिदस-३०१८/प्र.क्र-६९/योजना-५

बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक :- २० जून, २०१८.

**वाचा :-**

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-२०१४/प्र.क्र.११२/योजना-५, दिनांक २२ जानेवारी, २०१८.
२) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. Q-१३०१६/१/२०१६-VMC, दिनांक ०५ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीकरीता गठित करण्यात आलेल्या राज्य व जिल्हा दक्षता व संनियंत्रण समिती -मधील जिल्हा स्तरावरील जिल्हा दक्षता व संनियंत्रण समितीचे रुपांतर जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समिती (DISHA) करण्यात आले आहे. सदर जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समिती संदर्भात केंद्र शासनाच्या निदेशानुसार मार्गदर्शक सूचना संदर्भ क्रमांक -१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहे.

तथापि, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी संदर्भ क्रमांक-२ च्या पत्रान्वये जिल्हा विकास समन्वय व संनियत्रण समितीबाबतच्या केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनामध्ये अंशत: बदल केला आहे.

प्रस्तुत सुधारीत निदेशास अनुसरुन जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समिती-करीता राज्य स्तरावर सुधारीत निदेश देण्याचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीकरीता गठित करण्यात आलेल्या जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समिती (DISHA) करीता सुधारीत निदेश खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

- **जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समितीची रचनेमध्ये ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी खालील प्रवर्गामधून नामनिर्देशित केलेल्या सदस्यांचा समावेश करण्यात येत आहे:-**

१. सामाजिक, शैक्षणिक, सामाजिक क्षेत्रामध्ये सामाजिक आर्थिक विकासाबाबत विशेष कौशल्य किंवा अनुभव असलेले उच्च पदस्थ व्यक्ती.
२. संबंधित विभागामध्ये / जिल्ह्यामध्ये सामाजिक आर्थिक विकास क्षेत्रामधील नागरी संस्था/ संघटनामध्ये काम करणारे उच्च पदस्थ व्यक्ती.
३. ज्येष्ठ नागरीक प्रवर्गातील उच्च पदस्थ व्यक्ती (वय वर्षे ६० वर्षावरील)
पैकी, एक महिला सदस्य आवश्यक, एक अनुसूचीत जाती व अनुसूचीत जमातीमधील व्यक्ती आवश्यक.

- **जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समितीच्या (DISHA) कार्यकक्षेत येणाऱ्या योजनांची यादी संदर्भ क्र .१ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ठ -१ मधील खालील योजना वगळण्यात येत आहे.**

  १. Ujjwal DISCOM Assurance Yojna (UDAY)
  २. जल मार्ग विकास प्रकल्प

- **जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समितीच्या (DISHA) कार्यकक्षेत येणाऱ्या योजनांची यादी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ठ-१ मध्ये खालील योजनांचा समावेश करण्यात येत आहे.**

  १. प्रधानमंत्री खनिज क्षेत्र कल्याण योजना (PMKKKY)
  २. एकात्मिक शक्ती विकास योजना (IPDS)
  ३. Non-Lapsable Central Pool of Resources (NLCPR) scheme
  ४. राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY)
  ५. परंपरागत कृषि विकास योजना (PKVY)
  ६. Soil Health Card (SHC)
  ७. e-National Agriculture Markets (E-NAM)
  ८. PMKSY (HKKP)
  ९. Surface Minor Irrigation Scheme
  १०. Repair Renovation and restoration (RRR) Sheme of Ministry of Water Resources, River Development & Ganga Rejuvenation
  ११. प्रधानमंत्री आदर्श ग्राम योजना (PMAGY)
  १२. प्रधानमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (PMEGP)
  १३. सुगम्य भारत अभियान
  १४. बेटी बचाव बेटी पढाव
  १५. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अंमलबजावणी

जिल्हा विकास समन्वय व संनियंत्रण समितीच्या इतर सर्व बाबी दिनांक २२ जानेवारी,

२०१८ नुसार कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक 201806201556279020 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2018.07.02 13:03:35 +05'30'

(अनिल काळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (ग्रामविकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व).
४. सभापती, पंचायत समिती (सर्व).
५. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई.
६. उप सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
९. संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.
१०. संचालक,लेखा व कोषागारे संचालनालय,मुंबई.
११. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालये (सर्व).
१२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये (सर्व).
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१४. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१५. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
१६. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने).
१७. निवड नस्ती (कार्यासन-योजना-५)